# अभंग ज्ञानेश्वरी

श्री ज्ञानेश्वर दाभाडे,
सप्रेम नमस्कार.

तुम्हास 'अभंग ज्ञानेश्वरी' मागण्याचें कारण असे कीं, स्त्रीवर्गाला 'ज्ञानेश्वरी' सरळसाधी वाचताहि येत नाहीं आणि कळत तर मुळींच नाहीं. अशा स्थितींत पारायणानें नुसता अभिमान वाढतो, अभ्यास होत नाहीं. यामुळें माझ्या मनांत आलें कीं, ज्ञानेश्वरीची बरीचशी भाषा संस्कृतप्रचुर आहे आणि उरलेली मराठी असली तरी ७०० वर्षांपूर्वीची नागर असूनहि शब्दांची फार जुनीं रूपें असलेली अशी आहें. यामुळेंहि कांहीं शब्दांचे उच्चार चांगल्या शिकलेल्यांनासुद्धा योग्यरीतीनें करता येत नाहीत. उदाहरणार्थ, 'अहाचओहाच' ग्रामीण भाषेंत'वचावचा' म्हटले जाते. आजच्या शहरीं भाषेंत 'अचोवाचो' शब्द आहे. ज्ञानेश्वरींतील जुनें शब्दरूप वर दिलेच आहे. यासाठीं अगदी आपल्या निकटच्या काळांतील केशवसुत, बालकवि, गडकरी, कुसुमाग्रज यांनी उपयोजिलेली अद्यावत मराठी भाषा स्वरूपानन्दांनी प्रमाण मानून 'अभंग ज्ञानेश्वरीची' रचना केली. गोविंदाग्रज उर्फ गडकरी यांच्या भाषेची विलक्षण

छाप स्वामींच्या सगळ्याच ग्रंथांत दिसून येते.गडकरी यांची दोन नाटकें तर स्वामींनी प्रत्यक्ष जगूनच दाखविली. 'प्रेम संन्यास' आणि 'पुण्य प्रभाव' ही ती दोन नाटकें. स्वामींनी ठरवून स्वताच्या तरूणपणांतील प्रेमाचा संन्यास केल्यानंतरच त्यांचा पुण्यप्रभाव वाढला. दुसऱ्या शब्दांत सांगायचें झाल्यास स्वामींचा पुण्यप्रभाव मूळचाच एवढा प्रभावशाली होता कीं, ''झडझडूनि वहिला रीघ''या तत्त्वानुसार त्यांनी आपल्या जीवनांतील प्रेमाला कायमची तिलांजली दिली. याविषयीं स्वामींनी साकीबद्ध केलेली दोन्हीं प्रकरणें फार बहारदार उतरली आहेत. पहिलें प्रकरण वाचीत असतां आपल्या सारखेच एक असणाऱ्या स्वामींच्याविषयीं आत्मीयता वाटत असतानाच पुढील प्रकरणांत स्वामींचें उच्यकोटीचें व्यक्तित्त्व पाहून ''दिव्यत्त्वाची जेथ प्रतीति । तेथे कर माझें जुळती।।'' अशी गत होते.

या दोन्हीं प्रकरणांतील निवडक साक्या मी एकत्रच घेतल्या आहेत.—

काळ आठवे जो त्या काळीं देखत देवाजवळीं ।
जोडुनिया अंजुळीं प्रार्थिली दारिद्र्याची झोळी ।। १ ।।

दुःख कळावे दरिद्र्याचें उद्देशून मनानें ।
विशुद्ध अतःकरणें केला प्रयोग आनंदाने ।। २।।

वाटे, इच्छा कर्मविपाकें तीच फळाला आली ।
तरि कां न्यावी अता प्रभूच्या जवळीं ही कागाळी
।। ३।।
गाठीं पैसा नसतां कैसी ती विद्यापीठाची ।
संपादावी प्रिय छात्रासह पदवी बहुमानाची ।। ४।।

आणि पातला काळ भुकेचा काय मुखीं कोंबावे ।
केवि फाटले वस्त्र नेसुनी तोंड जगीं काढावे ।। ५।।

क्रूर अशी जी चिंता कृत्त्या तिनेच जैं घेरावे ।
तैं मन्मानस अंबरिषासम सैरावैरा धावे ।। ६।।

अशी स्थिती ही पाठ पुरवि जरि, तरि न मानिली
खंत ।
उच्यत्त्वाची उत्कट तळमळ तिळभर दे न उसंत
।। ७।।
दारिद्र्याचा तुफान दर्या अथांग तेथे पाणी ।
आणि उसळती लाटा पाहुनि होत जिवाचें पाणी
।। ८।।
सापडली निज आयुष्याची तयांत दुर्बळ नौका ।

दुर्दैवाच्या वाऱ्यासंगे कितीक घेई झोका ।। ९।।

सभोवार चौफेर फेकिली नजर तरी न किनारा ।
गिरगिर भोंवे जीव भोवरा नसे विचारा थारा ।। १०।।

सुदैव! अर्धक्षण सावध सुदूर एक किनारा ।
ज्ञान नभःप्रान्तांत लुकलुके आनंद ध्रुवतारा ।। ११।।

नजर स्थिर अन् शीड लाविले प्रेमाचें नौकेतें ।
सत्‌शीलाचें सुकाणु धरूनि कर्तव्याच्या हातें
।। १२।।
प्रेमळ निःसंगता असावी अनासक्त वा प्रेम ।
आयुष्याचें ध्येय हेंचि हें यास्तव योगक्षेम ।। १३।।

प्रयोग निःसंग प्रेमाचा माझा पूर्ण यशस्वी ।
व्हावा यास्तव या आयुष्यीं गमे योजना दैवी ।। ।।
।। १४।।

सकृतद्दर्शनी सुरम्य दर्शन होता जन्मान्तरिची ।
जागृत झाली स्मृति स्वभावे प्रेमाची अंतरिची १५।।

अन् पहिलें पाऊल टाकिले प्रेमाच्या प्रान्तांत ।
क्षणार्धांत निभ्रान्त जिंकिला अखिलचि प्रेम प्रान्त ।।
१६।।
प्रान्त अनंतत्त्वाचा लागे जीव समाधीमग्न ।
क्षणीं त्याच या आयुष्याचा प्रयोग झाला पूर्ण ।। १७

अमर्याद आनंद नि प्रेमा सीमा उरली नाही ।
दरवळला सौगंध लंघुनि जाय दिशाहि दाहीं ।। १८।।

त्या प्रेमाचें विश्वप्रेमी झालें पर्यवसान ।
आनंदी आनंद जाहला स्वयेच मी भगवान ।। १९।।

आक्रमिला गे पंथ जोवरी लागे प्रान्त अनंत ।
श्रांत अता मी कधी न होइन नांदे आनंदात ।। २०।।

कितीक जन्मे आली गेली तरी करी ना चिंता ।
सहजानंदे आज भोगिली इथेच पूर्णावस्था ।। २१।।

विकासोन्मुखा यदंतरी चित्शक्ति खेळते स्फुरणें ।
सर्वांगांचें नेत्र करोनी अवलोकावी तेणे ।। २२।।

अंतरिच्या सृष्टीस मानिती जरि कोणी आभास ।
कोटीगुणें प्रत्यक्षालाहि कां न म्हणावे भास ।। २३।।

साक्षात् इंद्रियजन्य सुखा लेखावे शाश्वत सत्य ।
तरि मी आंतर सौख्य भोगिलें न कां त्यांतहि तथ्य
।। २४।।
तथ्य असो वा नसो मानला मज हा प्रेमानंद ।
मना सारिता मागे लागे आत्मसुखाचा कंद ।। २५।।

जागृति, निद्रा, स्वप्न त्रय हें उल्लंघुनिया जावे ।
आत्मसुधामृत तदा साधकें अखंड आस्वादावे ।।
२६।।

प्रेमानंदीं आत्मानंदीं नांदे अभेद नाते ं।
ही साक्षात् अनुभूति सांगते निःसंदिग्ध जनातें ।। ।।
।।२७।।
स्वप्नान्तर प्रत्यक्ष सृष्टि या आपआपुल्या स्थानीं ।
विराजती पाहती, राहती अलिप्त आत्मज्ञानी ।।
।।२८।।
अन् जन्मुनी आत्मज्ञ बनावे हा माझा हव्यास ।
प्रयोगांत आयुष्य आघवे वेचावे हा ध्यास ।। २९।।

असा ध्यास लागतां जिवाला झाला साक्षात्कार ।
वृथा नव्हें की बोल, सांगतो अनुभव हा साचार
।।३०।।

स्वामींच्या व्यक्तित्त्वांतील तत्त्वज्ञ आणि कवि हे दोन्हींहि पैलूं एकसारखेच कमालीचे समृद्ध आहेत. त्यांची "अभंग ज्ञानेश्वरी" वाचीत असतां मन विस्मयानें थक्क होते. स्वामींची ही ज्ञानेश्वरी मराठी भाषेला लाभलेलें एक अभंग व अमर लेणें आहें. "आई, थोर तुझे उपकार!"एवढी एकच भावना मनांत घर करून रहाते.

तुमच्या लक्षांत न राहिल्यामुळें बराच उशीर झाला. मी सौ. ला म्हणालो कीं, त्यांना सारखे विचारू नको. त्यांच्या लक्षांत आल्यावर ते आणतीलच. मध्यंतरीच्या काळांत ***M. S. E. B.*** तील श्री.बाळासाहेब यादव, ते गजानन मंदिराजवळ रहातात. कांहीं वर्षांपूर्वी ते माझ्याकडे आल्यावर म्हणाले, "तुम्हीं बरीचशी पुस्तकें बाहेर दिलीत तर मलाहि कांहीं पुस्तकें द्या" त्यावेळीं १००/१२५ पुस्तकें मी त्यांना रिक्षा करून घरपोंच केली. त्यांत 'अभंग ज्ञानेश्वरी'चे दोन भागहि दिले होते. दुःखाची गोष्ट अशी कीं, ते अरसिक निघाले. केवळ कुतूहल म्हणून ते मला विचारण्यास आले होते, हे नंतर माझ्या लक्षांत आले. कारण त्यांनी तीं पुस्तकें दोन तीन मोठया खोक्यांत घालून माळयावर ठेवून दिली. कोठें टाकून दिली नाहीं हीच मेहेरबानी समजायची.

तुमच्या 'अभंग ज्ञानेश्वरी'ला वेळ लागल्यानंतर

सहज मनांत आलें कीं, यादव माझ्या पुस्तकांचा कांहींच उपयोग करीत नाहीत तर ‘अभंग ज्ञानेश्वरी’ घेऊन यावी. त्यांच्या घरीं गेल्यावर आणि औपचारिक बोलणे झाल्यावर त्यांनी पहिला भाग लगेच दिला. दुसरा माळयावरचा काढतो. साधारण ८ दिवसांनी या असे म्हणाले. ती धुळीनें माखली होती. तेथेच स्वच्छ पुसली वरचें रॅपर, कव्हर वगैरे सर्व काढले. आतां ती स्वच्छ झालेली प्रत मी सौ.ला वाचाण्यास दिली. तिचा अभिप्राय असा कीं, वाचतां वाचतांच त्याचा अर्थ कळतो.

माझ्या मतें स्त्रीयांच्या दृष्टीनें ही‘अभंग ज्ञानेश्वरी’ सुयोग्य आहे. मी घेतली त्यावेळीं दोन्हीं भागांची किंमत २० रूपये होती. मला वाटले महागाई वाढल्यामुळें आतां तिची किंमत २५० नक्कीच असणार. मात्र, तुमची नवी प्रत पाहून फार आश्चर्य वाटलें. दोन भागांची किंमत अवघी ५० रूपये! आतां मी त्या ३/४ घेतो. ती आणि तिच्या मैत्रिणी घरांत सामुहिक पारायण करतील.

माझी तुम्हास अशी सूचना आहे कीं, वारकरी सांप्रदायाच्या नियमानुसार ती मंदिरांत वाचतां येणार नाही मात्र, तुम्ही तुमच्या घरांत या ‘अभंग ज्ञानेश्वरी’चें पारायण करीत राहिलात तर

सामान्य स्त्री पुरूष फार मोठ्या संख्येने उपस्थित रहातील आणि ज्ञानेश्वरीच्या पारायणाचा त्यांना खऱ्या अर्थी लाभ होईल.

# अभंग अनुवादासंबंधीं दोन शब्द

स्वामींचा हा अभंग अनुवाद किती अर्थपूर्ण आणि अर्थघन आहे,हे अनेकांच्या लक्षांत आले नाहीं. मूळ ज्ञानेश्वरीच्या ओव्यांच्या आकलनासाठीं एक तलस्पर्शी प्रज्ञा असावी लागते.स्वामींच्या व्यक्तित्त्वाचें तें अविभाज्य अंग आहे. यामुळेंच ज्ञानदेवांच्या असंख्य ओव्या अभंगानुवादांत आपल्या अंगोपांगांनी कमालीच्या उजळून निघाल्या आहेत. ज्ञानेश्वरी खऱ्या अर्थाने समजण्यास स्वामींच्या या अभंगानुवादाचा मला फार उपयोग झाला. याशिवाय नवनिर्मितीची क्षमता असलेली प्रतिभा हा स्वामींच्या व्यक्तित्त्वाचा एक अनुपम पैलू आहे. एका ओवीला एक अभंग असा प्रकार सर्वच ओव्यांच्या बाबतींत नाही. कित्येक प्रसंगीं एका ओवीच्या अनुवादासाठीं ३/३ अभंग आहेत. मात्र त्यामुळें मूळ ओवी अशी खुलली आहे कीं, सांगता सोय नाही! या दोन वैशिष्ठ्यापेक्षांहि स्वामींचें सर्वात मोठे वैशिष्ठ्य

म्हणजे ती एक अधिकारी व्यक्ति होती हे होय. अनुवादामध्यें ज्ञानदेवांचे महत्वाचे असंख्य शब्द जसेच्या तसेच ठेवले आहेत.आणि असंख्य शब्दांना प्रतिशब्द वापरताना अर्थाची यत्किंचीतहि हानी होणार नाहीं, याविषयीं स्वामी फार दक्ष दिसतात.

आजच्या नवयुगांत ज्ञानदेवांना तोडीसतोड असणारा एकमेव कवि म्हणजे ‘बालकवि’.

दुपारच्या वेळीं, वेली आणि तृणपर्णांनी झाकोळलेला एकादा डोह, त्यांतून उन्हामुळें किंचित् वाफारे निघतात. त्या उन्हामध्येंहि क्वचित् वाऱ्याची एकादी झुळूक सुटते व लगेच बंद होते.

याचें बालकवींनी केलेलें काव्यमय वर्णन पहा—

“ इवलाच अधर हलवून, जल मंद सोडिते श्वास
इवलाच वेल लववून, ये नीज पुन्हा पवनास ”

ज्ञानदेवांची एक ओवी पहा—

कोंभाची लवलव । सांगे भूमीचें मार्दव ।।

एवढे भाषाप्रभू असणारे गडकरी, मात्र त्यांनाहि बालकवींच्या स्वर्गीय शब्द माधुर्याने मोहिनी घातली होती. केवढी थोर माणसे निर्माण झाली!

स्वामींच्या या साक्या पहा—

बाजारी ह्या जो तो करितो व्यवहाराचा धंदा ।
क्रीडे काव्य व्यवहारी परि लाखांतुनि एकादा ।। १ ।।

तयांत विरळा सत्कवि निपजे अनुभवी जो निज कविता ।
सत् कवींतहि क्वचित् संभवे अनुभवुनि आचरिता ।। २ ।।
अडूब सांगड जयें बांधिली काव्य व्यवहाराची ।
खरा यशस्वी तोचि ह्या जगीं कृतार्थ कविता त्याची ।। ३ ।।

या आणखी कांहीं साक्या पहा—

असो सिकंदर वा सेनानी वा हिटलर हेर ।
पडेल अंतीं मानेवरती मृत्यूची तलवार ।। १ ।।

असो सकळ तो जन काळाच्या पडतो भक्षस्थानीं ।
मात्र एकला अमर जाहला जगांत आत्मज्ञानी ।।२ ।।

# मोकळे पान भरण्यासाठीं कांहीं सुवचनें—

धरम न अरथ न काम रूची गति न चहऊ निरबान
जनम जनम रति राम पद यह बरदाऊ न आन ।।

निरबान निर्वाण बरदाऊ वरदान

नान्यत् स्पृहा रघुपते मदरान्तरीये ।
सत्यं वदामि च भवान् अखिलान्तरात्मा ।
भक्तिं प्रयच्छ रघुपुङ्गव निर्भरामे ।
कामादि दोषरहितं कुरू मानसं च ।।